**दहशतवाद विरोधी पथक पो.ठाणे गु.र.क्र.०६/२०१९ अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवणा-या न्याय प्रकरणात मा. सत्र न्यायालय, मुंबई, मा. एन.डी.पी.एस. विशेष न्यायालय, मुबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे न्यायालयीन कामकाज हाताळण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. अवधूत चिमलकर यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी- १०१९/प्र.क्र. ३३०/पोल-१०**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
२ रा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २१ ऑक्टोबर, २०२०

<u>संदर्भ</u> :- (१) विधी व न्याय विभाग, शासन आदेश क्र. एसपीपी-२०१९/यु.ओ.आर.६४/का-१४. दिनांक ०१ फेब्रुवारी, २०२०

(२) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दिनांक २९ जुलै, २०१५.

(३) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दिनांक १६ जून, २०१७.

<u>प्रस्तावना</u> :-

दहशतवाद विरोधी पथक पो. ठाणे गु.र.क्र.०६/२०१९ अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवणा-या न्याय प्रकरणात मा. सत्र न्यायालय, मुंबई, मा. एन.डी.पी.एस. विशेष न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे न्यायालयीन कामकाज हाताळण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून ॲड. श्री. अवधूत चिमलकर यांची संदर्भ क्र. १ वरील विधी व न्याय विभागाच्या दिनांक ०१.०२.२०२० च्या शासन आदेशान्वये नियुक्ती करण्यात यांना व्यावसायिक फी अदा करण्याची बाब शासन विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

दहशतवाद विरोधी पथक पो. ठाणे गु.र.क्र.०६/२०१९ अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवलेल्या मा. सत्र न्यायालय, मुंबई, मा. एन.डी.पी.एस. विशेष न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल न्यायालयीन प्रकरणात विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. अवधूत चिमलकर यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**मा. सत्र न्यायालय, मुंबई, मा. एन.डी.पी.एस. विशेष न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई**

अ) प्रतिदिन परिणामकारक सुणावणी फी रु. ३०,०००/-(रुपये तीस हजार फक्त)

ब) विचारविनिमय फी प्रति तास रु. ५,०००/- (रुपये पाच हजार फक्त)(कमाल मर्यादा अटीशिवाय)

२. ॲड. श्री. अवधूत चिमलकर यांना अनुज्ञेय असलेल्या व्यावसायिक फीचे प्रदान दर दोन महिन्याच्या न्यायालयीन कामकाजानंतर करण्यात यावे. मा. न्यायालयीन कामकाजाचे परिणाम-कारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकांकडून तपासून, प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान ॲड. श्री. अवधूत चिमलकर यांना होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलिस उपायुक्तांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) (१०१), गुन्हा अन्वेषण आणि दक्षता (००) (०५) दहशतवाद विरोधी पथक - (२०५५ ०५७१) २८ व्यावसायिक व विशेष सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.३६७/२०/व्यय-७, दि. २८/०९/२०२० अन्वये मिळालेल्या शासन मान्यतेनुसार तसेच शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/ प्र.क्र.२१/२०१५/ विनियम,दिनांक २९.०७.२०१५ तसेच दिनांक १६/०६/२०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२११५४२३४०४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9c66c37cf4df25ecf07a096af23d69cb2e83d31183e8f9d61db36e6ca846c9e, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2020.10.21 15:44:07 +05'30'

**( किशोर भालेराव )**
**उप सचिव (विधि), गृह विभाग,**

**प्रत:-**

१. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२. अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक विभाग,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. वरीष्ठ पोलीस निरीक्षक, दहशतवाद विरोधी पथक पो.स्टे,काळाचौकी, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. ॲड.श्री. अवधूत चिमलकर, ३०१,मारुती मेशन,१७ रघुनाथ दाजी मार्ग, फोर्ट, मुंबई.
८. विधी व न्याय विभाग (अ शाखा), मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (पोल-१०).